**राज्यातील ग्रामीण भागातील दारिद्रयरेषेखालील लाभार्थ्यांकरिता राबविण्यात येणाऱ्या “राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारित)” या योजनेला दिनांक ३१.०३.२०१४ पर्यंत मुदतवाढ देणे, प्रति घरकुल अनुदानात वाढ करुन “क” वर्ग नगरपरिषदांचा यात समावेश करणे व योजनेचे “राजीव गांधी घरकुल योजना” असे नामकरण करुन सदर योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र.रागांयो-२०१३/प्र.क्र.३३०/गृनिधो-१

गृहनिर्माण विभाग,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: २२ ऑगस्ट, २०१४.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.रागांयो-२००९/प्र.क्र.१८०/गृनिधो-१, दि.२१.८.२००९

२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.रागांयो २०१/प्र.क्र.४२ (दुय्यम धारिका)/गृनिधो-१, दिनांक २८.०३.२०१३

३) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र. रागांयो २०१२/प्र.क्र.४२/गृनिधो-१, दिनांक २०.०६.२०१३

४) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र.इंआयो २०१३/प्र.क्र.२९६/योजना-१०, दिनांक ७.११.२०१३

५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.रआयो २०१४/प्र.क्र.१०/बांधकामे,दिनांक. १८.७.२०१४

६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.घरकुल २०१२/प्र.क्र.३८/ (भाग-१)/का-१७, दिनांक ७.८.२०१४

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यातील ग्रामीण भागातील दारिद्रयरेषेखालील कुटुंबांना हक्काचे घरकुल उपलब्ध करुन देण्यासाठी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये “ सुवर्ण महोत्सवी ग्रामीण निवारा हक्क मोहीम” राबविण्याचा निर्णय घेण्यांत आला होता. या मोहिमेअंतर्गत सन २००९-२०१० ते सन २०११-१२ या ३ वर्षात शासनाच्या गृहनिर्माण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या “ राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र. १ (सुधारित)” च्या

माध्यमातून प्रतिवर्षी २१,००० घरकुले बांधण्याचे निश्चित करण्यात आले होते. "राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र. १ (सुधारित)" या योजनेअंतर्गत राज्य शासनामार्फत देण्यात येणारे प्रति घरकुल अनुदान रु. ६८,५००/- व लाभार्थ्याचा हिस्सा रु.१५००/- अशी एकूण घरकुलाची किंमत रु.७०,०००/- इतकी निश्चित करण्यात आली.

२. ग्राम विकास व जलसंधारण विभागामार्फत राज्याच्या ग्रामीण भागातील दारिद्ररेषेखालील कुटुंबांकरिता, "इंदिरा आवास योजना" ही योजना राबविण्यात येते. ही योजना केंद्र शासन पुरस्कृत व राज्य शासन सहभागाची योजना असून "इंदिरा आवास योजना" व "राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारित)" या दोन्ही योजना जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांच्या माध्यमातून अंमलात येतात. या दोन्ही योजनांतील लाभार्थ्यांची निवड ग्राम पंचायतींकडील दारिद्र्यरेषेखालील कुटूंबाकरीता तयार करण्यात आलेल्या एकाच प्रतीक्षा यादीतून करण्यात येते.

३. ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या निर्णय क्र.इंआयो २०१०/प्र.क्र.१२८/योजना-१० दिनांक २.०७.२०१० च्या शासन निर्णयान्वये इंदिरा आवास योजनेअंतर्गत रु.७०,०००/- इतकी घरकुलाची किंमत निश्चित करण्यात आली होती. त्यामध्ये केंद्र शासनाचा व राज्य शासनाचा एकत्रित हिस्सा रु.६८,५००/- व लाभार्थ्यांचा हिस्सा रु.१,५००/- इतका होता. केंद्र शासनाने इंदिरा आवास योजनेअंतर्गत बांधण्यात येणा-या घरकुलांच्या किंमतीत केलेल्या वाढीस अनुसरुन ग्रामविकास विभागाच्या संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णय दि. ७.११.२०१३ अन्वये राज्य शासनाचा हिस्सा तसेच राज्य शासनाच्या अतिरिक्त अनुदानात वाढ करून दि.१.०४.२०१३ पासून नवीन मंजूर घरकुलाची किंमत रु. १,००,०००/- इतकी निर्धारित करण्यात आली आहे. त्यामध्ये केंद्र व राज्य शासनाचा एकत्रित हिस्सा रु.९५,०००/- इतका वाढविण्यात आला असून, लाभार्थ्यांचा हिस्सा रु.५०००/- इतका ठरविण्यात आला आहे.

४. इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी "रमाई आवास योजना" तसेच आदिवासी विकास विभागामार्फत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी "शबरी आदिवासी घरकुल योजना" या योजना राबविण्यात येतात. ग्रामविकास व जलसंधारण विभागाने उपरोक्त दि.७.११.२०१३ अन्वये इंदिरा आवास योजनेअंतर्गत घरकुलांच्या किंमतीत रु.७०,०००/- वरुन रु.१,००,०००/- इतकी वाढ केल्याने त्याच धर्तीवर सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने त्यांच्या दि.१८.७.२०१४ च्या शासन निर्णयान्वये रमाई आवास योजनेतील तर आदिवासी विकास विभागाने त्यांच्या दि.७.८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये शबरी आदिवासी घरकुल योजनेतील घरकुलांच्या किंमतीत रु.७०,०००/- वरुन रु.१,००,०००/- इतकी वाढ केली आहे.

वरीलप्रमाणे इंदिरा आवास योजनेच्या व त्या योजनेच्या धर्तीवर राज्य शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या अन्य २ योजनांच्या घरकुलांच्या किंमतीत वाढ करण्यात आल्याने, इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर गृहनिर्माण विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारित) या योजनेअंतर्गत शासनातर्फे देण्यात येणाऱ्या सध्याच्या रु.६८,५००/- इतक्या प्रति घरकुल अनुदानातही रु.२६,५००/- इतकी वाढ करुन सदर अनुदान रु.९५,०००/- इतके करण्याचा व त्याअनुषंगाने घरकुलाची किंमत रु.१,००,०००/- इतकी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

५. "राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारित)" अंतर्गत सर्व प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी जून २०१४ च्या पावसाळी अधिवेशनात, रू.१००.०० कोटी इतका निधी, पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे. तसेच २०१०-११ ते २०१२-१३ या दरम्यान वितरीत केलेला निधी लक्षात घेता या योजनेअंतर्गत सर्व प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी रु.४६१.६३ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता रु.१५६.८० कोटी निधी आतापर्यंत उपलब्ध झालेला आहे. त्यापैकी सन २०१०-११ व २०११-१२ करिता वितरित करण्यात आलेला अनुक्रमे रु.४५ कोटी व ९३.२१ कोटी असा एकूण रु.१३८.२१ कोटी इतका निधी यापूर्वीच प्रति घरकुल रु.६८,५००/- या दराने जिल्हा ग्रामीण विकास यंत्राणांना म्हाडामार्फत वितरित करण्यात आलेला असल्यामुळे सद्यस्थितीत एकूण सर्व प्रवर्गासाठी रु.३७३.४२ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता रु.१०६.८० कोटी अशा प्रकारे एकूण रु.४८०.२२ कोटी इतका निधी उपलब्ध आहे. या तरतूदीतून रु.९५,०००/- प्रति घरकुल याप्रमाणे एकूण ५०,५५० घरांचे उद्दिष्ट पूर्ण होणार आहे.

६. राज्यातील वाढत्या नागरीकरणाचा विचार करुन राज्य शासनाने पूर्वीच्या काही ग्रामीण क्षेत्राचा नव्याने नागरी क्षेत्रात समावेश करुन तो भाग "क" वर्ग नगर परिषद क्षेत्र म्हणून जाहीर केलेला आहे. तसेच मूळ ग्रामीण भागातील दारिद्रयरेषेखालील कुटुंबे रोजगाराच्या शोधार्थ मोठया प्रमाणावर जवळच्या तालुक्याच्या ठिकाणी स्थलांतरित होत आहेत. त्यामुळे अशी दारिद्रयरेषेखालील कुटूंबे जरी स्थलांतरणानंतर "क" वर्ग नगर परिषद क्षेत्रात आली तरी त्यांना घरकुलाचा लाभ मिळावा यासाठी अशा दारिद्रयरेषेखालील कुंटुंबांकरिता घरकुल बांधण्यासाठी अनुदान देणे आवश्यक आहे. त्यामुळे "राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारित)" योजनेचा क्षेत्र विस्तार करुन ही योजना राज्यातील "क" वर्ग नगरपरिषदांना लागू करण्याबाबतचा प्रस्तावही शासनाच्या विचाराधीन होता.

७. उपरोक्त बदलांमुळे "राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारित)" या योजनेच्या मूळ स्वरुपात बदल होत असल्याने राज्य मंत्रिमंडळाच्या दि.६.८.२०१४ रोजीच्या बैठकीत सदर प्रस्ताव राज्य मंत्रीमंडळाच्या विचारार्थ सादर करण्यात आला होता. उपरोक्त सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन शासनाने पुढील निर्णय घेतले आहेत.

**<u>शासन निर्णय :</u>**

१. इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर राज्यातील ग्रामीण भागातील दारिद्रयरेषेखालील लाभार्थ्यांकरिता राबविण्यांत येणा-या "राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र. १ (सुधारित)" या योजनेला दि.३१.३.२०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच या योजनेचे नांव बदलून "राजीव गांधी घरकुल योजना" असे करण्यास तसेच ही नवीन योजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. राजीव गांधी ग्रामिण निवारा योजना क्र.१ (सुधारित) या योजनेंतर्गत दिनांक १ एप्रिल,२०१३ पासून घरकुलाची किंमत रु.७०,०००/- वरुन रु.१,००,०००/- इतकी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. घरकुलाकरिता सध्याच्या राज्य शासनाच्या रु. ६८,५००/- या अनुदानामध्ये रु. २६,५००/- इतकी वाढ करुन सदर अनुदान रु. ९५,०००/- इतके करण्यास मान्यता देण्यात येत आहे. योजनेतील लाभार्थ्यांचा हिस्सा रु. ५,०००/- इतका असेल.

३. वाढीव अनुदानाचा लाभ पूर्वलक्षी प्रभावाने "राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र. १ (सुधारित)" या योजनेखालील ग्रामीण क्षेत्रांमधील सन २०१२-१३ या कालावधीकरीता उपलब्ध केलेल्या निधीतून घरकुल मंजूर करण्यात आलेल्या लाभार्थ्यांना देण्यास मान्यता देण्यात येत आहे. उपरोक्त अनुदान वाढीमुळे यापूर्वी सदर योजनेअंतर्गत सन २०१२-१३ करिता उपलब्ध झालेल्या एकूण रु.३८०.२४ कोटी निधीचे शासन निर्णय क्र. रागांयो २०१२/प्र.क्र.४२/गृनिधो-१, दिनांक २०.०६.२०१३ व शासन निर्णय क्र.रागांयो २०१/प्र.क्र.४२ (दुय्यम धारिका)/गृनिधो-१, दिनांक २८.०३.२०१३ अन्वये करण्यात आलेले प्रवर्गनिहाय व जिल्हानिहाय वाटप याद्वारे रद्द करण्यात येत असून सुधारित जिल्हानिहाय वाटपाची विवरणपत्रे सोबतच्या "परिशिष्ट १" व "परिशिष्ट २" प्रमाणे राहतील. या प्रित्यर्थ होणारा खर्च दिनांक २०.०६.२०१३ व दिनांक २८.०३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. "राजीव गांधी घरकुल योजना" या योजनेकरीता २०१४-१५ या वर्षाकरीता पूरक मागणीव्दारे प्राप्त झालेल्या रु. १००.०० कोटी निधीपैकी रु.८०.०० कोटी निधी ग्रामीण भागातील दारिद्रयरेषेखालील सर्व प्रवर्गातील कुटूंबांसाठी वापरात आणण्यास मान्यता देण्यात येत आहे. या निधीच्या जिल्हानिहाय वाटपाचे विवरणपत्र सोबतच्या "परिशिष्ट ३" प्रमाणे राहील.

५. उपरोक्त (३) व (४) मधील वाटप पूर्वीप्रमाणेच म्हाडामार्फत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना केले जाईल व याबाबतच्या अटी व शर्ती, यापूर्वीच्या वितरण आदेशातील अटी व शर्तीप्रमाणेच राहतील.

६. "राजीव गांधी घरकुल योजना" या योजनेचा क्षेत्रविस्तार ही योजना राज्यातील सर्व "क" वर्ग नगरपरिषदांना लागू करण्यात येत आहे. त्याकरिता सुरुवातीचा निधी म्हणून रु.२०.०० कोटी निधी "क"

वर्ग नगरपरिषदांना संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयांमार्फत सदर योजना अंमलात आणण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. “क” वर्ग नगर परिषद क्षेत्रातील घरकुलाची किंमत रु.१,५०,०००/- इतकी असेल. या अंतर्गत लाभार्थ्यांना प्रति घरकुल रु.१,३८,७५०/- इतके शासनाचे अनुदान देण्यात येईल व लाभार्थी हिस्सा रु.११,२५०/- राहील. रु.२०.०० कोटी निधी म्हाडामार्फत संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे व संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडून संबंधित नगरपरिषदांना वाटप होईल. निधी वाटपाचे विवरणपत्र “परिशिष्ट ४” प्रमाणे राहील.

७. “राजीव गांधी घरकुल योजना” या योजनेकरीता सन २०१४-१५ या वर्षासाठी होणारा खर्च मागणी क्र. क्यू-३ मुख्य लेखाशिर्ष — २२१६- गृहनिर्माण — ०३ ग्रामीण गृहनिर्माण — ८००, इतर खर्च, (०१) ग्रामीण गृहनिर्माण योजनांतर्गत पंचवार्षिक योजना (०१) (०३) राजीव गांधी ग्रामीण गृहनिर्माण योजना क्र.१ (सुधारीत) (२२१६ १४०७) (राज्य योजना-सर्वसाधारण) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४७१/ व्यय-३, दिनांक २१.०८.२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१४०८२२१२३७१७१९०९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHRIKANT LAXMANRAO PULKUNDWAR
Date: 2014.08.22 19:12:21 +05'30'

(डॉ.श्री.ल.पुलकुंडवार)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

१) मा.राज्यपालांचे सचिव (पत्राद्वारे)

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा.पालक मंत्री (सर्व जिल्हे)

४) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव

५) मा.अध्यक्ष, विधानसभा, विधान भवन,मुंबई

६) मा.सभापती, विधानपरिषद, विधान भवन,मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई.

८) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई.

९) मा.विधानसभा सदस्य, सर्व

१०) मा.विधान परिषद, सदस्य, सर्व

११) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई

१२) अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

१३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता) /लेखापरीक्षा, मुंबई

१४) महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा व अनुज्ञेयता) /लेखापरीक्षा, नागपूर

१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

१६) सर्व विभागीय आयुक्त

१७) सर्व जिल्हाधिकारी

१८) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

१९) मुख्य अधिकारी,गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ कोकण/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/ औरंगाबाद

२०) मुख्याधिकारी, सर्व "क" वर्ग नगरपरिषदा, महाराष्ट्र (संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत).

२१) उपमुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी(लेखा)
कोकण विभाग,पुणे,नाशिक,औरंगाबाद,अमरावती,नागपूर

२२) अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)

२३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

२४) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद (सर्व)

२५) कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (सर्व)

२६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२७) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

२८) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई ४०० ००१.

२९) सहसंचालक, लेखा व कोषागारे, (कॉम्प्युटर सेल) नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई

३०) सर्व उप सचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई

३१) अवर सचिव, (अर्थसंकल्प), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई

३२) निवड नस्ती, (गृनिधो-१)

परिशिष्ट -१

(शासन निर्णय क्र.रागांयो-२०१३/प्र.क्र.३३०/गृनिधो-१,दि. २२.०८.२०१४ चे सहपत्र)

राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारीत) योजनेकरीता सन २०१२-१३ मध्ये करण्यात आलेले वाटप रदद करुन राजीव गांधी घरकुल योजनेअंतर्गंत या निधीचे सर्वसाधारण प्रवर्गासाठी जिल्हानिहाय वाटप दर्शविणारे प्रपत्र.

| | जिल्हा | उपलब्ध निधी नुसार लाभार्थी | अनुदान एकूण रु. |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | २३२ | २२०४०००० |
| २ | रायगड | ३९१ | ३७१४५००० |
| ३ | रत्नागिरी | ५६७ | ५३८६५००० |
| ४ | सिंधुदुर्ग | ३३७ | ३२०१५००० |
| ५ | नाशिक | ५२० | ४९४००००० |
| ६ | धुळे | ४२२ | ४००९०००० |
| ७ | नंदूरबार | २४६ | २३३७०००० |
| ८ | जळगांव | १७४८ | १६६०६०००० |
| ९ | अहमदनगर | १९५८ | १८६०१०००० |
| १० | सातारा | ४५८ | ४३५१०००० |
| ११ | सांगली | १९५ | १८५२५००० |
| १२ | सोलापूर | ११८४ | ११२४८०००० |
| १३ | कोल्हापूर | ३२९ | ३१२५५००० |
| १४ | औरंगाबाद | १३७१ | १३०२४५००० |
| १५ | जालना | १२६४ | १२००८०००० |
| १६ | परभणी | १४४० | १३६८००००० |
| १७ | हिंगोली | ६३० | ५९८५०००० |
| १८ | बीड | १७४० | १६५३००००० |
| १९ | नांदेड | १२९० | १२२५५०००० |
| २० | उस्मानाबाद | १०४२ | ९८९९०००० |

| | | | |
|---|---|---|---|
| २१ | लातूर | ७१६ | ६८०२०००० |
| २२ | बुलढाणा | १६८ | १५९६०००० |
| २३ | अकोला | ६७४ | ६४०३०००० |
| २४ | वाशिम | ६०७ | ५७६६५००० |
| २५ | अमरावती | ९०० | ८५५००००० |
| २६ | यवतमाळ | २१८९ | २०७९५५००० |
| २७ | वर्धा | ७०० | ६६५००००० |
| २८ | नागपूर | ८९० | ८४५५०००० |
| २९ | भंडारा | ५३१ | ५०४४५००० |
| ३० | गोंदिया | १८९६ | १८०१२०००० |
| ३१ | चंद्रपूर | १२५९ | ११९६०५००० |
| ३२ | गडचिरोली | ८८७ | ८४२६५००० |
| | एकूण | **२८,७८१** | **२,७३४,१९५,०००** |

परिशिष्ट -२

(शासन निर्णय क्र.रागांयो-२०१३/प्र.क्र.३३०/गृनिधो-१,दि. २२.०८.२०१४ चे सहपत्र)

राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१ (सुधारीत) योजनेकरीता सन २०१२-१३ मध्ये करण्यात आलेले वाटप रदद करुन राजीव गांधी घरकुल योजनेअंतर्गंत या निधीचे अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी जिल्हानिहाय वाटप दर्शविणारे प्रपत्र. प्रति घरकुल रु. ९५,०००/-

| अ.क्र. | जिल्हा | एकूण लाभार्थी | अनुदान रु. |
|---|---|---|---|
| १ | **ठाणे** | १८२८ | १७३,६६०,००० |
| २ | **रायगड** | २७८ | २६,४१०,००० |
| ३ | **नाशिक** | १६७६ | १५९,२२०,००० |
| ४ | **धुळे** | १०३७ | ९८,५१५,००० |
| ५ | **नंदूरबार** | २१७७ | २०६,८१५,००० |
| ६ | **जळगांव** | १५८ | १५,०१०,००० |
| ७ | **अहमदनगर** | ४२ | ३,९९०,००० |
| ८ | **हिंगोली** | १२६ | ११,९७०,००० |
| ९ | **नांदेड** | १६८ | १५,९६०,००० |
| १० | **अकोला** | ४७ | ४,४६५,००० |
| ११ | **वाशिम** | ८९ | ८,४५५,००० |
| १२ | **अमरावती** | ५९० | ५६,०५०,००० |
| १३ | **यवतमाळ** | ९६६ | ९१,७७०,००० |
| १४ | **वर्धा** | १११ | १०,५४५,००० |
| १५ | **नागपूर** | ७१ | ६,७४५,००० |
| १६ | **गोंदिया** | ६१९ | ५८,८०५,००० |
| १७ | **चंद्रपूर** | ४३१ | ४०,९४५,००० |
| १८ | **गडचिरोली** | ८२९ | ७८,७५५,००० |
|  | **एकूण** | **११२४३** | **१,०६८,०८५,०००** |

| परिशिष्ट -३<br>(शासन निर्णय क्र.रागांयो-२०१३/प्र.क्र.३३०/गृनिधो-१,दि. २२.०८.२०१४ चे सहपत्र) | | | |
|---|---|---|---|
| राजीव गांधी घरकुल योजनेअंतर्गत सन २०१४- १५<br>या वर्षासाठी मंजूर रुपये ८० कोटी निधीचे जिल्हानिहाय वाटप दर्शविणारे प्रपत्र. (प्रति घरकुल रु.९५,०००/-) | | | |
| | जिल्हा | उपलब्ध निधी नुसार लाभार्थी | अनुदान एकूण |
| १ | ठाणे | ६८ | ६,४६०,००० |
| २ | रायगड | ११४ | १०,८३०,००० |
| ३ | रत्नागिरी | १६६ | १५,७७०,००० |
| ४ | सिंधुदुर्ग | ९९ | ९,४०५,००० |
| ५ | नाशिक | १५२ | १४,४४०,००० |
| ६ | धुळे | १२४ | ११,७८०,००० |
| ७ | नंदूरबार | ७२ | ६,८४०,००० |
| ८ | जळगांव | ५११ | ४८,५४५,००० |
| ९ | अहमदनगर | ५७३ | ५४,४३५,००० |
| १० | सातारा | १३४ | १२,७३०,००० |
| ११ | सांगली | ५७ | ५,४१५,००० |
| १२ | सोलापूर | ३४६ | ३२,८७०,००० |
| १३ | कोल्हापूर | ९६ | ९,१२०,००० |
| १४ | औरंगाबाद | ४०१ | ३८,०९५,००० |
| १५ | जालना | ३७० | ३५,१५०,००० |
| १६ | परभणी | ४२१ | ३९,९९५,००० |
| १७ | हिंगोली | १८४ | १७,४८०,००० |
| १८ | बीड | ५०९ | ४८,३५५,००० |
| १९ | नांदेड | ३७७ | ३५,८१५,००० |
| २० | उस्मानाबाद | ३०५ | २८,९७५,००० |

| | | | |
|---|---|---|---|
| २१ | लातूर | २१० | १९,९५०,००० |
| २२ | बुलढाणा | ४९ | ४,६५५,००० |
| २३ | अकोला | १९७ | १८,७१५,००० |
| २४ | वाशिम | १७७ | १६,८१५,००० |
| २५ | अमरावती | २६३ | २४,९८५,००० |
| २६ | यवतमाळ | ६४१ | ६०,८९५,००० |
| २७ | वर्धा | २०५ | १९,४७५,००० |
| २८ | नागपूर | २६१ | २४,७९५,००० |
| २९ | भंडारा | १५६ | १४,८२०,००० |
| ३० | गोंदिया | ५५५ | ५२,७२५,००० |
| ३१ | चंद्रपूर | ३६८ | ३४,९६०,००० |
| ३२ | गडचिरोली | २६० | २४,७००,००० |
| | एकूण | **८,४२१** | **७९९,९९५,०००** |

(परिशिष्ट-४)

(शासन निर्णय क्र.रागांयो-२०१३/प्र.क्र.३३०/गृनिधो-१,दि. २२.०८.२०१४ चे सहपत्र)

राजीव गांधी घरकुल योजने करीता सन २०१४-१५ मध्ये प्राप्त झालेल्या निधीचे "क" वर्ग नगर परिषद क्षेत्रातील लाभार्थ्यांसाठी तालुकानिहाय वाटप दर्शविणारे विवरणपत्र (प्रति घरकुल रु.१,३८,७५०/-)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा | नगरपरिषद | घरकुलांची संख्या | अनुदान |
| १ | ठाणे | जव्हार | ४ | ५५५,००० |
| **एकूण** | | | **४** | **५५५०००** |
| | | | | |
| १ | रायगड | अलिबाग | ७ | ९७१,२५० |
| २ | | कर्जत | ९ | १,२४८,७५० |
| ३ | | महाड | ९ | १,२४८,७५० |
| ४ | | माथेरान | १ | १३८,७५० |
| ५ | | मुरुड जंजिरा | ४ | ५५५,००० |
| ६ | | पेण | १२ | १,६६५,००० |
| ७ | | रोहा | ७ | ९७१,२५० |
| ८ | | श्रीवर्धन | ५ | ६९३,७५० |
| ९ | | उरण | १० | १,३८७,५०० |
| **एकूण** | | | **६४** | **८८८००००** |
| | | | | |
| १ | रत्नागिरी | खेड | ५ | ६९३,७५० |
| २ | | राजापूर | ३ | ४१६,२५० |
| ३ | | दापोली | ५ | ६९३,७५० |
| ४ | | देवरुख | ४ | ५५५,००० |
| ५ | | गुहागर | १ | १३८,७५० |
| ६ | | लांजा | ५ | ६९३,७५० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **एकूण** | | | **२३** | **३१९१२५०** |
| | | | | |
| १ | सिंधुदूर्ग | मालवण | ६ | ८३२,५०० |
| २ | | सावंतवाडी | ८ | १,११०,००० |
| ३ | | वेगुर्ला | ४ | ५५५,००० |
| ४ | | कणकवली | ५ | ६९३,७५० |
| **एकूण** | | | **२३** | **३१९१२५०** |
| | | | | |
| १ | नाशिक | भगूर | ४ | ५५५,००० |
| २ | | इगतपुरी | १० | १,३८७,५०० |
| ३ | | नांदगांव | ७ | ९७१,२५० |
| ४ | | सटाणा | १२ | १,६६५,००० |
| ५ | | सिन्नर | २१ | २,९१३,७५० |
| ६ | | त्रयंबक | ४ | ५५५,००० |
| ७ | | येवला | १६ | २,२२०,००० |
| **एकूण** | | | **७४** | **१०२६७५००** |
| | | | | |
| १ | अहमदनगर | देवळाली प्रवरा | १० | १,३८७,५०० |
| २ | | पाथर्डी | ९ | १,२४८,७५० |
| ३ | | राहाता | ७ | ९७१,२५० |
| ४ | | राहूरी | १२ | १,६६५,००० |
| ५ | | श्रीगोंदा | १० | १,३८७,५०० |
| ६ | | शिर्डी | ११ | १,५२६,२५० |
| **एकूण** | | | **५९** | **८१८६२५०** |
| | | | | |
| १ | नंदुरबार | नवापूर | ११ | १,५२६,२५० |
| २ | | तळोदे | ८ | १,११०,००० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **एकूण** | | | **१९** | **२६३६२५०** |
| | | | | |
| १ | धुळे | सिंदखेड | १५ | २,०८१,२५० |
| **एकूण** | | | **१५** | **२०८१२५०** |
| | | | | |
| १ | जळगांव | भडगांव | १२ | १,६६५,००० |
| २ | | धरणगांव | ११ | १,५२६,२५० |
| ३ | | एरंडोल | १० | १,३८७,५०० |
| ४ | | फैजपूर | ८ | १,११०,००० |
| ५ | | जामनेर | १५ | २,०८१,२५० |
| ६ | | पारोळा | १२ | १,६६५,००० |
| ७ | | रावेर | ९ | १,२४८,७५० |
| ८ | | सावदा | ६ | ८३२,५०० |
| ९ | | यावल | १२ | १,६६५,००० |
| **एकूण** | | | **९५** | **१३१८१२५०** |
| | | | | ० |
| १ | पुणे | आळंदी | ९ | १,२४८,७५० |
| २ | | भोर | ६ | ८३२,५०० |
| ३ | | इंदापूर | ८ | १,११०,००० |
| ४ | | जेजुरी | ५ | ६९३,७५० |
| ५ | | जुन्नर | ८ | १,११०,००० |
| ६ | | सासवड | १० | १,३८७,५०० |
| ७ | | शिरुर | १२ | १,६६५,००० |
| **एकूण** | | | **५८** | **८०४७५००** |
| | | | | |
| १ | सांगली | आष्टा | १२ | १,६६५,००० |
| २ | | तासगाव | १२ | १,६६५,००० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | | जत | १०५ | १४,५६८,७५० |
| **एकूण** | | | **१२९** | **१७८९८७५०** |
| | | | | |
| १ | सातारा | महाबळेश्वर | ४ | ५५५,००० |
| २ | | म्हसवडा | ८ | १,११०,००० |
| ३ | | पांचगणी | ५ | ६९३,७५० |
| ४ | | रहिमतपूर | ६ | ८३२,५०० |
| ५ | | वाई | ११ | १,५२६,२५० |
| ६ | | मलकापूर | १० | १,३८७,५०० |
| **एकूण** | | | **४४** | **६१०५०००** |
| | | | | |
| १ | सोलापूर | अक्कलकोट | १३ | १,८०३,७५० |
| २ | | दुधनी | ४ | ५५५,००० |
| ३ | | करमाळा | ७ | ९७१,२५० |
| ४ | | कुर्डुवाडी | ७ | ९७१,२५० |
| ५ | | मेंदर्गी | ४ | ५५५,००० |
| ६ | | मंगळवेढा | ७ | ९७१,२५० |
| ७ | | सांगोला | ११ | १,५२६,२५० |
| **एकूण** | | | **५३** | **७३५३७५०** |
| | | | | |
| १ | कोल्हापूर | गडहिंग्लज | ९ | १,२४८,७५० |
| २ | | कागल | ११ | १,५२६,२५० |
| ३ | | करुंदवाड | ७ | ९७१,२५० |
| ४ | | मलकापूर | २ | २७७,५०० |
| ५ | | मुरगूड | ४ | ५५५,००० |
| ६ | | पन्हाळा | १ | १३८,७५० |
| ७ | | वडगाव | ८ | १,११०,००० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **एकूण** | | | **४२** | **५८२७५००** |
| | | | | |
| १ | औरंगाबाद | गंगापूर | ९ | १,२४८,७५० |
| २ | | कन्नड | १३ | १,८०३,७५० |
| ३ | | खुल्ताबाद | ५ | ६९३,७५० |
| ४ | | पैठण | १३ | १,८०३,७५० |
| ५ | | वैजापूर | १३ | १,८०३,७५० |
| **एकूण** | | | **५३** | **७३५३७५०** |
| | | | | |
| १ | परभणी | जिंतूर | १४ | १,९४२,५०० |
| २ | | मानवत | १० | १,३८७,५०० |
| ३ | | पाथरी | १२ | १,६६५,००० |
| ४ | | पूर्णा | १२ | १,६६५,००० |
| ५ | | सेलू | १५ | २,०८१,२५० |
| ६ | | सोनपेठ | ५ | ६९३,७५० |
| **एकूण** | | | **६८** | **९४३५०००** |
| | | | | |
| १ | हिंगोली | कळमनुरी | ८ | १,११०,००० |
| **एकूण** | | | **८** | **१११००००** |
| | | | | |
| १ | जालना | अंबड | १० | १,३८७,५०० |
| २ | | भोकरदन | ८ | १,११०,००० |
| ३ | | परतूर | ११ | १,५२६,२५० |
| **एकूण** | | | **२९** | **४०२३७५०** |
| | | | | |
| १ | नांदेड | माहूर | ० | ० |
| २ | | भोकर | १० | १,३८७,५०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | | बिलोली | ५ | ६९३,७५० |
| ४ | | धर्माबाद | ११ | १,५२६,२५० |
| ५ | | हदगाव | ९ | १,२४८,७५० |
| ६ | | कंधार | ८ | १,११०,००० |
| ७ | | किनवट | ९ | १,२४८,७५० |
| ८ | | कुंदलवाडी | ५ | ६९३,७५० |
| ९ | | लोहा | ८ | १,११०,००० |
| १० | | मुदखेड | ८ | १,११०,००० |
| ११ | | मुखेड | ९ | १,२४८,७५० |
| १२ | | उमरी | ४ | ५५५,००० |
| १३ | | अर्धापूर | ८ | १,११०,००० |
| **एकूण** | | | **९४** | **१३०४२५००** |
| | | | | |
| १ | लातूर | अहमदपूर | १४ | १,९४२,५०० |
| २ | | औसा | १२ | १,६६५,००० |
| ३ | | निलंगा | १२ | १,६६५,००० |
| **एकूण** | | | **३८** | **५२७२५००** |
| | | | | |
| १ | उस्मानाबाद | भूम | ६ | ८३२,५०० |
| २ | | कळंब | ८ | १,११०,००० |
| ३ | | मुरुम | ६ | ८३२,५०० |
| ४ | | नळदुर्ग | ६ | ८३२,५०० |
| ५ | | परांडा | ६ | ८३२,५०० |
| ६ | | तुळजापूर | ११ | १,५२६,२५० |
| ७ | | उमरगा | ११ | १,५२६,२५० |
| **एकूण** | | | **५४** | **७४९२५००** |
| | | | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | बीड | धारुर | ७ | ९७१,२५० |
| २ | | गेवराई | ११ | १,५२६,२५० |
| ३ | | केज | १० | १,३८७,५०० |
| **एकूण** | | | **२८** | **३८८५०००** |
| | | | | |
| १ | बुलढाणा | देऊळगाव | १० | १,३८७,५०० |
| २ | | जळगाव | ९ | १,२४८,७५० |
| ३ | | लोणार | ७ | ९७१,२५० |
| ४ | | मेहकर | १४ | १,९४२,५०० |
| ५ | | नांदुरा | १४ | १,९४२,५०० |
| ६ | | सिंदखेडराजा | ५ | ६९३,७५० |
| **एकूण** | | | **५९** | **८१८६२५०** |
| | | | | |
| १ | अमरावती | चांदूररेल्वे | ६ | ८३२,५०० |
| २ | | चांदूरबाजार | ६ | ८३२,५०० |
| ३ | | चिखलदरा | २ | २७७,५०० |
| ४ | | दर्यापूर | १२ | १,६६५,००० |
| ५ | | धामणगाव | ७ | ९७१,२५० |
| ६ | | मोर्शी | १२ | १,६६५,००० |
| ७ | | शेंदुरजना | ७ | ९७१,२५० |
| **एकूण** | | | **५२** | **७२१५०००** |
| | | | | |
| १ | यवतमाळ | आर्णी | ९ | १,२४८,७५० |
| २ | | दारव्हा | ८ | १,११०,००० |
| ३ | | दिग्रस | १४ | १,९४२,५०० |
| ४ | | घाटंजी | ७ | ९७१,२५० |
| ५ | | नेर | ९ | १,२४८,७५० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | | पांढरकवडा | १० | १,३८७,५०० |
| ७ | | उमरखेड | १५ | २,०८१,२५० |
| **एकूण** | | | **७२** | **९९९००००** |
| | | | | |
| १ | वाशिम | मंगरुळपीर | १० | १,३८७,५०० |
| २ | | रिसोड | ११ | १,५२६,२५० |
| **एकूण** | | | **२१** | **२९१३७५०** |
| | | | | |
| १ | अकोला | बाळापूर | १४ | १,९४२,५०० |
| २ | | मुर्तिजापूर | १३ | १,८०३,७५० |
| ३ | | पातूर | ७ | ९७१,२५० |
| ४ | | तेल्हारा | ७ | ९७१,२५० |
| **एकूण** | | | **४१** | **५६८८७५०** |
| | | | | |
| १ | नागपूर | कळमेश्वर | ६ | ८३२,५०० |
| २ | | काटोल | १४ | १,९४२,५०० |
| ३ | | खापा | ५ | ६९३,७५० |
| ४ | | मोहपा | २ | २७७,५०० |
| ५ | | मोवाड | ३ | ४१६,२५० |
| ६ | | नरखेड | ७ | ९७१,२५० |
| ७ | | रामटेक | ७ | ९७१,२५० |
| ८ | | सावनेर | १० | १,३८७,५०० |
| ९ | | मौदा | ४ | ५५५,००० |
| १० | | माहादुळा | ६ | ८३२,५०० |
| **एकूण** | | | **६४** | **८८८००००** |
| | | | | |
| १ | भंडारा | पवनी | ७ | ९७१,२५० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **एकूण** | | | **७** | **९७१२५०** |
| | | | | |
| १ | गोंदिया | तिरोडा | ८ | १,११०,००० |
| **एकूण** | | | **८** | **१११००००** |
| | | | | |
| १ | वर्धा | देवळी | ६ | ८३२,५०० |
| **एकूण** | | | **६** | **८३२५००** |
| | | | | |
| १ | चंद्रपूर | ब्रम्हपूरी | ११ | १,५२६,२५० |
| २ | | मुल | ८ | १,११०,००० |
| ३ | | राजूरा | ९ | १,२४८,७५० |
| **एकूण** | | | **२८** | **३८८५०००** |
| | | | | |
| १ | गडचिरोली | देसाईगंज | ९ | १,२४८,७५० |
| **एकूण** | | | **९** | **१२४८७५०** |
| | | | | |
| **एकूण** | | | **१४४१** | **१९९९३८७५०** |